

# हॅरियट टबमॅन

लेखक: मॅथ्यू ग्रँट
मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक

# हॅरियट टबमॅन

**लेखक: मॅथ्यू ग्रँट**
**मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक**



# मेरीलँडची एक गुलाम मुलगी

गुलामाची मुलगी सहा वर्षांची झाली की कामासाठी तयार समजली जाई. त्यानुसार घरकामासाठी म्हणून अरमिन्टाला आई-वडिलांना सोडून जावं लागलं. हळू काम केलं तर तिला चांगलाच मार मिळायचा.



आई-हॅरियट आणि बाबा-बेनही हतबल होते. कारण तक्रार करणारे गुलामाची लगेच विक्री करत. मेरीलँडमध्ये गुलामाचचं आयुष्य खडतर जरी असलं तरी इतर ठिकाणी त्याहीपेक्षा भयानक परिस्थिती होती.

अरमिन्टाला आई समजावून सांगायची की कुठलीही कुरकुर न करता मालक जे म्हणेल ते काम निमूट करायचं. मालकाने तुला जर खाली दक्षिणेच्या भागात विकलं तर तिथे तुला मर मर राबवून घेतील.

ते ऐकून अरमिन्टा रागाने पहायची. ती एक बंडखोर मुलगी होती.

त्याकाळी उत्तरेकडील राज्यातल्या गुलामांना गुलामगिरीतून मुक्त करण्यात आले होते. पण दक्षिण भागामधे मात्र अजून प्रथा चालू होती. कापूस आणि भाताच्या शेतीसाठी त्यांना कामासाठी गुलाम लागायचे.

उत्तर राज्यातील लेखक आणि विचारवंतानी गुलामगिरी संपवण्यासाठी चळवळ चालू केली. त्यांना अॅबॉलिशनिस्ट म्हणत. गुलामाच्या मालकांनी हे अशक्य आहे असं म्हणत जोरदार विरोध केला. त्यामुळे मोठे युद्ध सुरु झाले.





त्या दरम्यान अनेक गुलाम गुलामगिरीतून मुक्त होण्याची स्वप्न पाहत होते.

एके दिवशी मळ्यात काम करत असताना अरमिन्टाने एका गुलामाला पळून जाताना पाहिले. तेव्हा ती तेरा वर्षांची होती. गोऱ्या मालकाने ओरडून तिला सांगितले की "त्या पळपुट्याला थांबव." तिने त्याचं अजिबात ऐकलं नाही.

त्या गोऱ्या मालकाने चवताळून अरमिन्टाच्या डोक्याच्या दिशेने जड लोखंडी गोळा फेकला.

तिच्या डोक्याला खूप खोल जखम झाली आणि ती कशीबशी त्यातून वाचली. पण पुढे आयुष्यभर त्याचा परिणाम कायम राहिला. तिला कधीही अचानक फिट्स यायच्या.

अरमिन्टा मोठी झाल्यावर तिला सगळे तिच्या आईच्या नावाने हॅरियट हाक मारू लागले. तिची उंची जेमतेम पाच फूट असूनही अंगात खूप ताकद होती. लाकडं फोडणं, शेताची सगळी कामं अशी पुरुषी काम आपल्या मालकासाठी करायची.

१९४४मध्ये तिचं जॉन टबमन ह्या मुक्त काळ्या माणसाशी लग्न झालं. आपणही स्वतंत्र होऊ असं तिचं स्वप्न होतं. पण झालं उलटच! तिला आणि तिच्या तीन भावांना दक्षिणेच्या खालच्या भागात विकलं गेलं आहे असं तिच्या कानावर आलं.



# भूमिगत रेल्वेमार्ग (Underground Railroad)

तिच्या नवऱ्याकडून तिला कसलीही मदत मिळाली नाही. पण तिच्या कानावर गुलामांची सुटका करणाऱ्या भूमिगत रेल्वेमार्गाची माहिती पडली. .तिला वाटले की ही जमिनीखालून चालणारी ट्रेन आहे. तिचा शोध घ्यायचा आणि त्यात बसून उत्तरेकडे जायचं असा तिने निश्चय केला.

पळून जायचं ठरल्यावर हॅरियट टबमनचे भाऊ सुरुवातीला तिच्याबरोबर होते. पण नंतर मात्र ते घाबरले.

आणि ते परत फिरले. पण हॅरियट मात्र पळत राहिली आणि एका गोऱ्या बाईच्या घरी पोचली. त्या दयाळू बाईनी तिला मदत करण्याचे पूर्वी आश्वासन दिले होते.

“भूमिगत रेल्वेमार्ग म्हणजे काही खरी रेल्वे नाही,” त्या बाईनी हॅरियटला सांगितले. “ही एक घरांची साखळी आहे. गुलामगिरी नष्ट व्हावी असं वाटणाऱ्या लोकांची ही घरं आहेत. त्या घरातील लोक तुला आसरा देतील आणि उत्तरेकडे जायला मदत करतील.”



हॅरियटचा एका घरातून दुसऱ्या घराकडे प्रवास चालू होता. “रेल्वेमार्गाच्या थांब्यावरील” प्रेमळ गोरे तिला खाऊ-पिऊ घालत आणि लपून राहायला मदत करीत. एकदाची तो पेन्सेल्वेनियाला पोचली. सूर्य उगवत होता. तिने हे खरंच आहे हे खात्री करून घेण्यासाठी आपल्या हातांकडे पाहिलं. हो, ती आता मुक्त हॅरियट होती! काही वर्षानंतर आठवण सांगताना ती म्हणाली, “मला त्यावेळी वाटलं की मी स्वर्गातच आहे! एक मुक्त आणि स्वतंत्र माणूस!”



# तिच्या समाजासाठीची मोझेस

हॅरियट मागे राहिलेल्या आणि अजूनही गुलाम म्हणून राबत असलेल्या आपल्या नातेवाईकांना विसरू शकत नव्हती. ती एका हॉटेलमध्ये नोकरी करून पैसे साठवू लागली.हे पैसे ती आपल्या गुलाम नातेवाईकांना उत्तरेला आणून मुक्त करण्यासाठी वापरणार होती.

आपल्या बहिणीच्या कुटुंबाची विक्री करणार आहेत ही बातमी तिला कळली. शूर क्वेकरनी बहिण, तिचा नवरा आणि त्यांची दोन मुलं ह्यांना गुलाम भागातून पळवून आणलं आणि मग हॅरियट त्यांना बाल्टिमोरला



भेटली. ‘भूमिगत रेल्वेमार्गा’ च्या मदतीने पुढचा प्रवास करत त्यांना स्वतंत्र राज्यात घेऊन आली.

१८५०मध्ये पळून जाणाऱ्या गुलामांसाठी एक कायदा संमत झाला, त्यामुळे आता उत्तरेकडच्या राज्यात पळून आलेल्या गुलामांवर नवीन संकट उभे राहिले.



ह्या कायद्यानुसार आता पळून आलेल्या गुलामांना तसेच त्यांना पळून जायला मदत करणाऱ्या लोकांना अटक करता येणार होती.

पण “भूमिगत रेल्वेमार्गाने” अजिबात आपले प्रयत्न कमी केले नाही. त्यांनी कॅनडा कडच्या मार्गावर अजून स्टेशन वाढवली. हॅरियटने परत दक्षिणेकडे जाऊन आपले भाऊ आणि अजून दोन व्यक्तींची सुटका केली. पुन्हा १८५१ मध्ये आपल्या नवऱ्याला घ्यायला ती परत गेली. पण दरम्यानच्या काळात त्याने दुसरे लग्न केले होते आणि त्यामुळे त्याने उत्तरेकडे यायला नकार दिला.

ते पाहून तिला प्रचंड वाईट वाटले. परंतु जीव धोक्यात घालून ती इकडे आली होती त्यामुळे ती संधी न दवडू देता तिने तिथल्या गुलामांना एकत्र केलं आणि त्यांना कॅनडाला घेऊन आली.



वर्षातून अनेक वेळा ती आपला जीव धोक्यात घालून प्रवास करायची आणि गुलामांना मुक्त करायची. हे काम तिने अनेक वर्ष केले. हॅरियट टबमन “भूमिगत रेल्वेमार्ग”वरची सर्वात प्रसिध्द “कंडक्टर’ बनली. ती शेतावर यायची आणि “माझ्या लोकांना जाऊ दे” असं गाण म्हणायची. तो इशारा गुलामांना बरोबर कळायचा ते तिच्या मागे रांगा लावायचे.

गुलामांना पकडणाऱ्या टोळ्यांची नजर चुकवत, भुकेल्या आणि गांजलेल्या गुलामांना भूमिगत रेल्वेमार्गावरच्या एका घरातून दुसऱ्या घरात सुखरूप नेत हॅरियट प्रचंड जोखीम पत्करून त्यांना शेकडो मैलाचा प्रवास करून कॅनडाला सुखरूप घेऊन येत असे.






गुलाम आदराने आणि कृतज्ञतेने तिला “मोझेस” म्हणत. इस्त्रायलमधील मुलांना इजिप्तमध्ये हक्काच्या भूमीत घेऊन जाणाऱ्या मोझेस प्रमाणेच हॅरियट गुलामांची मुक्तिदाता होती.

गोऱ्या जमीनदारांनी तिला पकडून देण्याऱ्या व्यक्तीला ४०,००० डॉलर असे मोठे बक्षीस जाहीर केले होते. पण कुणीही तिला पकडू शकले नाही. ती म्हणायची की संकटाचा सामना करायला देव तिला बळ देत होता. आणि हॅरियट स्वत:च अनेक युक्त्या आणि करामतींमध्ये तरबेज होती.

एखादा गुलाम घाबरून माघारी फिरायचा विचार करू लागला तर ती सरळ त्याच्या डोक्यावर पिस्तुल रोखायची आणि म्हणायची, “एकतर स्वतंत्र हो नाहीतर मर.” कारण तिला माहित होतं जर एखादा गुलाम परत गेला तर भूमिगत रेल्वेचं गुपित त्याच्याकडून जबरदस्तीने काढून घेतलं जाईल. पण कुठल्याही गुलामाने कधीच परत जाण्याचा हट्ट धरला नाही. १९ वेळा दक्षिणेला फेऱ्या मारून तिने ३००हून अधिक स्त्री-पुरुष आणि मुलांची सुटका केली.

ती म्हणायची, “माझी ट्रेन मार्ग सोडून कधीच धावली नाही आणि मी कधीच माझ्या प्रवाश्यांना गमावलं नाही.”

# नागरी युद्धाची वीरकन्या

हॅरियट आपल्या वृद्ध आईबाबांना उत्तरेला घेऊन येण्यात यशस्वी झाली. ते गुलामगिरीतून मुक्त झाले परंतु दक्षिणेकडे अजूनही अनेक गुलाम अतिशय हलाखीचं जीवन जगत होते. त्यामुळे ही क्रूर प्रथा पूर्णपणे नष्ट करण्यासाठी सशस्त्र लढ्याची गरज भासू लागली.



अमेरिकेत १८६१ मधे नागरी युद्धाला सुरुवात झाली. सुरुवातीला राष्ट्राध्यक्ष लिंकन गुलामगिरीविरुद्धच्या लढ्याला उघडपणे विरोध करायला टाळाटाळ करत होते. परंतु युनियन आर्मीने कुणालाही अजिबात न जुमानता गुलाम आणि मुक्त झालेल्या गुलामांना सैनिक म्हणून लढ्यात सहभागी करून घेतलं. हॅरियट टबमनही पोर्ट रॉयल, साउथ कॅलिफोर्निया इथून स्वतःहून सामील झाली. सुरुवातीचे काही दिवस तिने कॅम्प हॉस्पिटलमधे नर्स बनून जखमी सैनिकांची सुश्रुषा करण्याचं काम केलं. नंतर तिच्यावर गुलामांना घेऊन त्या भागामधे गनिमी योजनेची आखणी करण्याची जबाबदारी देण्यात आले. युनियन आर्मीमधे हेर आणि शत्रूंच्या कारवायांची टेहळणी करण्याचे काम तिने केलं.

२ जून १८६३ मध्ये हॅरियटच्या नेतृत्वाखाली तीनशे काळ्या गुलामांनी कोम्बाही नदीवर हल्ला



चढवला. गुलाम पुरवणाऱ्या टोळीला नेस्तनाबूत करून आठशे गुलामांना मुक्त करणाऱ्या हल्ल्याची ती खरीखुरी नायिका होती. पूर्वेकडील वर्तमानपत्रानी तिच्या साहसी कार्याची भरभरून वाखाणणी केली. त्यामुळे ती आणि तिची कामगिरी प्रकाशात आली.

१८६५ ला युद्ध संपलं तेव्हा एका हॉस्पिटलमधे ती गुलामगिरीतून स्वतंत्र झालेल्या आपल्या बांधवांची सेवा करण्याचं काम करत होती. अतिकामाने खूप थकल्यामुळे तिने अर्बन, न्युयॉर्क इथे आपल्या वृद्ध आई-बाबांबरोबर राहण्याचा निर्णय घेतला.

संविधानाच्या १३ व्या घटना दुरुस्तीनुसार अमेरिकेत गुलामगिरी अवैध ठरवण्याचा कायदा संमत झाला. परंतु काळे लोक अजूनही गरीब आणि अशिक्षित आहेत हे तिने पाहिलं. त्यांच्या मदतीसाठी तिच्या घराचे दरवाजे सदैव उघडे होते. नंतर तिने आश्रम बांधला आणि तिथे राहणाऱ्या वृद्ध व आजारी माणसांच्या देखभालीसाठी भाजीपाला विकण्याचा व्यवसाय सुरु केला.

हॅरियट टबमनचा मृत्यू १० मार्च १९१३ मध्ये झाला. लष्करी इतमामात तिला शेवटची मानवंदना देण्यात आली.

समाप्त

